**राज्यात नोव्हेल कोरोना (COVID-१९) विषाणुच्या पार्श्वभुमीवर पाण्याच्या टँकर्सचे अधिकार उप विभागीय अधिकारी यांना प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एससीवाय-२०२०/प्र.क्र.६३/म-७**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०२०.

**प्रस्तावना:-**

नोव्हेल कोरोना (COVID-१९) विषाणुच्या पार्श्वभुमीवर स्थलांतरीत मजूर व नागरिकांकरिता निर्माण केलेल्या शिबीरांकरिता स्थानिक स्वराज्य संस्थेकडून पुरेसा पिण्याच्या पाण्याचा पुरवठा होऊ शकत नसल्यास, टँकरद्वारे पिण्याच्या साधारण वापराकरिता पाणी उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. तसेच टंचाई परिस्थिती विचारात घेता पिण्याच्या पाण्याचे टँकर मंजूर करणे आवश्यक आहे. जिल्हा प्रशासन कोरोना साथीच्या नियंत्रणात्मक कामकाजात व्यस्त असल्याने टँकर मंजूरीचे अधिकार संबंधित उप विभागीय अधिकारी यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नोव्हेल कोरोना (COVID-१९) विषाणुच्या पार्श्वभुमीवर पिण्याच्या पाण्याची टंचाई विचारात घेऊन, पिण्याच्या पाण्याचे टँकर्स मंजूर करण्याचे जिल्हाधिकारी यांना असलेले अधिकार संबंधित उप विभागीय अधिकारी तथा उप विभागीय दंडाधिकारी यांना प्रदान करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००४२२१५०८५२४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.04.22 15:12:34 +05'30'

**( सुभाष उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व विभागीय आयुक्त.
३) सर्व जिल्हाधिकारी.
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद.
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७) सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद/पाटबंधारे विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग.
८) सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणी पुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई.
९) सर्व मुख्य अभियंता, ग्रामीण/नागरी पाणी पुरवठा.
१०) महालेखापाल/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११) महालेखापाल/ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२) वित्त विभाग (अर्थसंकल्प/व्यय-९) मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव (म-३/म-११) महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन अधिकारी (पापु-१४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती, कार्यासन म-७, महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित,**

१) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.